**मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण या योजनेंतर्गत मंजूर प्रस्तावांना सन २०१४-१५ या वर्षात ५५ % निधी वितरीत करणेबाबत....**

# महाराष्ट्र शासन
## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१११४/प्र.क्र.१५०/पदुम-१४

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२

तारीख: २५ मार्च, २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः रासनि-१२९३/(१५९)/पदुम-१४, दि. ८ जानेवारी, १९९६
२) शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-२०१२/प्र.क्र.३३२/पदुम-१४, दि. ४ मार्च, २०१३
३) राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे पत्र क्र. एनसीडीसी/आरडी(डब्ल्यू)/२६-७३/८९, दिनांक १८ सप्टेंबर,२००८
४) राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे पत्र क्र. एनसीडीसी/१-१/२००१-फिश, दिनांक ३१ जानेवारी,२०१२
५) शासन निर्णय क्रमांक मत्स्यवि-१११४/ प्र.क्र.१५०/पदुम-१४, दि. ८.८.२०१४
६) आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र.मत्स्य/सां/०६११०१/२९/२०१४-१५, दिनांक १३.३.२०१५

**प्रस्तावना -**

मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण योजनेअंतर्गत मच्छिमारांना यांत्रिकी नौका बांधणीकरीता राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनेखाली अर्थसहाय्य देण्याची योजना शासनामार्फत राबविण्यात येते. यासाठी राष्ट्रीय सहकार विकास निगमकडून मंजूरी दिलेल्या प्रस्तावांकरिता राज्य शासनास ८० % कर्ज मंजूर करण्यात येते. त्यापैकी राज्य शासनाकडून मच्छिमार संस्थेच्या गटास प्रथम १०% खास विमोचक भागभांडवल (राज्य),२०% खास विमोचक भागभांडवल(रा.स.वि.नि.) व ५% भागभांडवल (रा.स.वि.नि.) असा एकूण २५% निधी राज्य शासनाकडून दिला जातो. त्यानंतर नौकेच्या कामाची प्रगती पाहून उर्वरित ५५% कर्ज उपलब्ध करुन देण्यात येते. सदर योजनेअंतर्गत राष्ट्रीय सहकार विकास निगमकडून मंजूरी प्राप्त असलेल्या एकूण १० गटांना ५५% कर्जाची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

मासेमारी नौकांचे यांत्रिकीकरण या योजनेअंतर्गत मच्छिमारांना यांत्रिक नौका बांधणीकरीता राष्ट्रीय सहकार विकास निगम पुरस्कृत योजनेखाली अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत ५५% रकमेच्या हिश्यापोटी सोबत जोडलेल्या परिशिष्ट -अ मधील एकूण ९ मच्छिमार सहकारी संस्थांच्या १० गटांना रु.१,४७,६८,५००/- ( रुपये एक कोटी सत्तेच्याळीस लाख अडूसष्ट हजार पाचशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त वाचा मधील शासन निर्णय दिनांक ४.३.२००१३ मध्ये नमूद केल्यानुसार राष्ट्रीय सहकार विकास निगमकडून मंजूरी प्राप्त गटांपैकी ज्या गटांनी दिनांक ४.३.२०१३ पूर्वी लाकडी नौकऐवजी फायबर नौका बांधल्या आहेत, अशा गटांना रा.स.वि.नि. च्या दिनांक १८.९.२००८ च्या पत्रान्वये निश्चित केलेली फायबर बोटीची किंमत अथवा फायबर बोट बांधण्यासाठी आलेला प्रत्यक्ष खर्च यापैकी जी कमी असेल, ती रक्कम अनुज्ञेय राहील. अधिकची रक्कम कोषागारात जमा करण्यात यावी. तसेच ज्या गटांनी दिनांक ४.३.२०१३ नंतर लाकडी नौकऐवजी फायबर नौका बांधल्या आहेत, अशा गटांना रा.स.वि.नि. च्या दिनांक ३१.१.२०१२ च्या पत्रान्वये निश्चित केलेली फायबर बोटीची किंमत अथवा फायबर बोट बांधण्यासाठी आलेला प्रत्यक्ष खर्च यापैकी जी कमी असेल, ती रक्कम अनुज्ञेय राहील. अधिकची रक्कम कोषागारात जमा करण्यात यावी. संबंधित गटांना अनुज्ञेय असलेल्या रकमेपेक्षा जास्त रक्कम वितरीत होणार नाही, हे पाहण्याची जबाबदारी सर्व संबंधित आंहरण व संवितरण अधिकाऱ्याची राहील.

३. याकरिता येणारा खर्च " मागणी क्रमांक-डी-९, ६४०५-मत्स्यव्यवसायासाठी कर्जे, (००) (१९५) मच्छिमार सहकारी संस्थांना कर्जे, पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना, (००) (०१) यांत्रिक नौका /खोल सागरातील मासेमारी नौकांसाठी कर्ज-रा.स.वि.नि. हिस्सा (भारीत) (६४०५ ००८१), ५५ कर्जे व आगाऊ रक्कमा या लेखाशिर्षातंर्गत सन २०१४-१५ साठीच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. याबाबत संबंधित जिल्हयांचे सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय (तांत्रिक) हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील. तसेच आयुक्त, मत्स्यव्यवसाय हे नियंत्रक अधिकारी राहतील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे दिनांक ०९.२.२०१५ च्या परिपत्रकानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२५१७३४५५५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Parvez Ahmad Shahabuddin

Digitally signed by Parvez Ahmad Shahabuddin
DN: CN = Parvez Ahmad Shahabuddin, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.03.25 17:46:46 +05'30'

**प.श. अहमद**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/ सिंधुदूर्ग
३. सह आयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय याचे कार्यालय, मुंबई
४. प्रादेशिक उपआयुक्त, मुंबई विभाग, मुंबई
५. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी
६. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता ) मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखाधिकारी, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी/
१०.उप जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर/ठाणे/ रायगड/ रत्नागिरी
११.सर्व संबंधित संस्था
१२.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प/अर्थबळ), मंत्रालय, मुंबई
१४. कार्यासन पदुम-१६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.निवड नस्ती, पदुम-१४

प्रत माहितीकरिता, सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक

शासन निर्णय क्रमांक: मत्स्यवि-१११४/ प्र.क्र.१५०/पदुम-१४, दिनांक २५ मार्च, २०१५ सोबतचे परिशिष्ट- अ

| अ.क्र. | जिल्हा | संस्था | गट | प्रकल्प किंमत | प्रकल्प किंमतीच्या ५५% रक्कम | अनुज्ञेय ५५% रकमेपैकी पूर्वी वितरीत केलेली रक्कम | आता वितरीत करावयाची रक्कम | नौका प्रकार |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | मुंबई | अखिल भारत मच्छी.सह सो,मुंबई शहर | श्री.अमिताभ दत्तात्रय धुमाळ | ५५२७२०० | ३०४०००० | २५४०००० | ५००००० | फायबर नौका |
| २ | | | श्री.बाळू शंकर बारुडे | ५५२७२०० | ३०४०००० | २५४०००० | ५००००० | फायबर नौका |
| ३ | | ससुनडॉक मत्स्योद्योग सहकारी सोसायटी | श्री.रमेश अर्जून भगत | ४९७०२०० | २१८३५८३ | ० | २१८३५८३ | फायबर नौका |
| ४ | | झाई मच्छीमार विविध कार्य सह सोय,झाई | श्री.धर्मेन भरत माच्छी | ५५३४२०० | ३०४३८०० | २७४३८०० | ३००००० | फायबर नौका |
| ५ | मुंबई उपनगर | माहूल मत्स्यव्यवसाय सह. सोसायटी | श्री.प्रविण मन्नु सोलंकी | ५५३३४०० | २९३८८५९ | ० | २४३८८५९ | फायबर नौका |
| ६ | ठाणे | निर्मलसागर ॲक्वा म.स.सं. | श्री.मोरश्वर पांडूरंग मर्दे | १८२४९०० | १००३७०० | ० | १००३७०० | लाकडी नौका |
| ७ | रायगड | द्रोणागिरी माऊली मच्छीमार विविध कार्य सह.सो.लि. | श्री.दिगंबर मारूती तरे | ४८०९००० | २६४४९५० | ० | २६४४९५० | फायबर नौका |
| ८ | रत्नागिरी | साखरीनाटे म.स.सं. | श्री.अ.सज्जाद मकसूद हुना | ४३८०५०० | २४०९२७५ | ० | २४०९२७५ | फायबर नौका |
| ९ | | राजीवडा महिला मच्छीमार सह.सं. | श्री.समीर लतीफ कसू | ६९१२००० | ३८०१६०० | ० | २२८८१२५ | फायबर नौका |
| १० | | मिरकरवाडा आदर्श मच्छमार सह संस्था मर्या,मिरकरवाडा | श्री.हिदायत इस्माईल वस्ता | ५७१४५०० | ३१४३००० | २६४३००० | ५००००० | लाकडी नौका |
| | | **एकूण संस्था ९** | **एकूण प्रस्ताव १०** | ५०७३३१०५ | २७२४८७७३ | १०४६६८०७ | १४७६८५०० | |